**शासकीय वर्ग-१ व वर्ग-२ च्या राजपत्रित अधिकाऱ्यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी ३० वर्षाच्या सेवा कालावधीपुढे सेवेत राहण्याच्या पात्रापात्रता आजमविण्यासाठी करावयाच्या पुनर्विलोकनासाठी समिती स्थापन करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-३९२५/ प्र.क्र.७८/प्रशा-२,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १८ मार्च, २०२५.

**वाचा** - १. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-विपुस-१०९२/प्र.क्र.२०/९२/१५, दिनांक १८.१०.१९९६.

२.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक-एलपीएल २०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दिनांक १०.०६.२०१९.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) १९८२ च्या नियम १०(४) व ६५ नुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम/संशायस्पद सचोटीच्या राज्य शासकीय अधिकाऱ्यांला शासन सेवेतील मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याचे अधिकार समचित प्राधिकाऱ्यांना (नियुक्ती प्राधिकाऱ्यांना) आहेत. त्यादृष्टीने संदर्भाधीन दिनांक १०.०६.२०१९ च्या शासन निर्णयान्वये शासकीय अधिकाऱ्यांची सेवेत राहण्याची पात्रापात्रता आजमविण्याचे निकष विहित करण्यात आलेले आहेत. या तरतुदींच्या आधारे शासनाच्या सेवेतील वर्ग-१ व वर्ग-२ च्या राजपत्रित अधिकाऱ्यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यानंतर सेवेत राहण्याची पात्रापात्रता आजमविण्यासाठी मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखाली पुनर्विलोकनास पात्र होणाऱ्या अधिकाऱ्यांसाठी सर्व मंत्रालयीन विभागांनी संबंधित सचिवांच्या मान्यतेने विभागीय पुनर्विलोकन समित्यांची स्थापना करणे आवश्यक आहे.

## शासन निर्णय :-

वरील तरतुदीस अनुसरुन शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या नियंत्रणाखाली पुनर्विलोकनास पात्र होणाऱ्या अधिकाऱ्यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यानंतर सेवेत राहण्यासाठीची पात्रापात्रता आजमविण्याच्या दृष्टीने पुनर्विलोकन करुन शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे पुनर्विलोकन समिती स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | अध्यक्ष |
| २ | उपसचिव/सहसचिव (एसडी), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य |
| ३ | उप सचिव/सह सचिव (प्रशासन), | सदस्य |
| ४ | कक्ष अधिकारी/अवर सचिव (प्रशा-२) | सदस्य सचिव |

२. समितीने शालेय शिक्षण व क्रिडा विभागाच्या नियंत्रणाखालील पुनर्विलोकनास पात्र होणाऱ्या अधिकाऱ्यांची वयाची ५०/५५ वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यानंतर सेवेत राहण्याची पात्रापात्रता आजमविण्यासाठी खालील निकषानुसार प्रकरणाची छाननी करावी.

१) वयाच्या ३५ व्या वर्षापूर्वी सेवेत असलेल्या वर्ग-१ व वर्ग-२ च्या राजपत्रित अधिकाऱ्यांच्या प्रकरणांचे सध्याप्रमाणे वयाची ५० वर्षे पूर्ण होतेवेळी किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होतेवेळी, यापैकी जे प्रथम घडेल तेव्हा, एकदाच पुनर्विलोकन करण्याची सध्याची पध्दती कायम ठेवण्यात यावी. सेवेत ठेवण्याचा निकष शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व “चांगला” पेक्षा कमी नाही असा अभिलेख विहित करण्यात यावा.

२) वयाच्या ३५व्या वर्षानंतर सेवेत आलेल्या राजपत्रित अधिकाऱ्यांच्या बाबतीत वयाच्या ५५ वर्षे करावयाच्या पुनर्विलोकनासाठी शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व “चांगला” पेक्षा कमी नाही असा अभिलेख हा निकष विहित करण्यात यावा.

३. समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे असेल:-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या नियंत्रणाखालील महाराष्ट्र शिक्षण सेवा व सामान्य राज्य सेवेमधील गट-अ व गट-ब मधील पुनर्विलोकनास पात्र होणाऱ्या अधिकारी यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षाचा सेवाकालावधी पूर्ण झाल्यावर त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्यास पात्रापात्रता आजमविण्यासाठी विहित निकषानुसार पुनर्विलोकन करणे.

२) वरीलप्रमाणे पुनर्विलोकनासाठी प्रत्येक वर्षी दिनांक १ ऑगस्ट ही तारीख ग्राहय धरावी व दिनांक १ ऑगस्ट रोज पुर्नविलोकनास योग्य असलेल्या अधिकाऱ्यांची प्रकरणे पुनर्विलोकन समित्यांमार्फत पुनर्विलोकीत करुन घ्यावीत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०३१८१७३९४३४९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2025.03.18 17:40:25 +05'30'

**(ज्ञानेश्वर आव्हाड)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) सर्व संचीालक
३) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

प्रत माहितीसाठी अग्रेषित:-

१) मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
२) मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/विधानसभा) विधानभवन यांचे स्वीय सहाय्यक.
३) सर्व विधानपरिषद सदस्य/विधानसभा सदस्य यांचे स्वीय सहाय्यक
४) प्रधान सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती(प्रशा-२).

*****************